राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतर्गत नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याकरिता <u>Online परीक्षा प्रक्रिया राबविण्याबाबत</u>

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक. संकीर्ण- ५०१७/प्र.क्र -३२१/आस्था-८,
बांधकाम भवन, २५- मर्झबान पथ,
फोट, मुंबई-४०० ००१,
दिनांक- २४ ऑगस्ट , २०१७.

वाचा:- १) शासन निर्णय , सामान्य प्रशासन विभाग , क्रमांक - प्रानिमं-२००७ / प्र.क्र. ४६ / ०७ /१३- अ, दिनांक १९ ऑक्टोंबर, २००७

प्रस्तावना :-

राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतर्गत नामनिर्देशनाच्या कोट्यातील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या शासन निर्णय दिनांक १९ ऑक्टोंबर,२००७ अन्वये संबंधित जिल्हयांच्या जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली एक निवड समिती गठीत केलेली आहे. सदर निवड समितीमार्फत जिल्हा स्तरावरील सर्व विभागांच्या वर्ग-३ च्या पदांची भरती केली जाते. अशा प्रकारे वर्ग-३ च्या पदांची भरती करीत असतांना परीक्षांचे प्रश्नपत्रिका तयार करणे, परीक्षा घेणे, उत्तरपत्रिका तपासणे इत्यादी बाबींसाठी जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी व इतर जिल्हास्तरीय अधिकाऱ्यांचा बऱ्याच प्रमाणात वेळ व श्रम यांचा अपव्यय होतो व त्याचा विपरित परिणाम इतर विकास कामांवर होतो. त्यामुळे जिल्हा परिषदेतील वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांची भरती प्रक्रिया Online पध्दतीने घेण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

<u>शासन निर्णय</u>

१) राज्यातील सर्व जिल्हा परिषदेमधील वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांकरिता यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १९ ऑक्टोंबर, २००७ च्या शासन निर्णयांन्वये गठीत

करण्यात आलेल्या निवड समितीच्या कक्षेतुन जिल्हा परिषदेची वर्ग-३ च्या पदांची भरती वगळण्यात येत आहे.

२) जिल्हा परिषदेकडील वर्ग-३ च्या कर्मचाऱ्यांच्या भरतीसाठी घेण्यात येणारी परीक्षा ही यापुढे Online पध्दतीने घेण्यात येईल.

३) खुल्या प्रवर्गासाठी रु.५००/- व मागासवर्गीयांसाठी रु. २५०/- असे परीक्षा शुल्क आकारण्यात येईल.

४) वरील प्रमाणे निश्चित केलेले शुल्क Online पध्दतीने स्विकारले जाईल. उदा. Net Banking, Credit/Debit Card,e-Wallet, भारतीय स्टेट बँकेच्या चलनाद्वारे इत्यादी.

५) एका उमेदवाराला एक किंवा अनेक संवर्गातील पदांसाठी अर्ज करण्याची मुभा राहील परंतु प्रत्येक पदासाठी त्याला स्वतंत्र परीक्षा शुल्क आकारले जाईल.

६) उमेदवारांना अर्ज करतांना त्यांना कोणत्या जिल्हा परिषदेमध्ये नियुक्ती हवी आहे त्याबाबत त्यांना १ ते ३४ असे जिल्हा परिषदांसाठी पसंतीक्रम दयावे लागतील.

७) प्रत्येक संवर्गाची गुणवत्ता यादी व त्या संवर्गासाठी Cut-off Marks ( न्युनतम पात्रता गुण ) प्रसिध्द करण्यात येतील.

८) Cut-Off Marks (न्युनतम पात्रता गुण) प्रमाणे निवड केलेल्या उमेदवारांची प्रमाणपत्रे सेवाप्रवेश नियमानुसार तपासण्याची कार्यवाही त्यांच्या मूळ जिल्हयाच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत करण्यात येईल व या तपासणीचा निकाल Online Software वर upload करण्यात येईल.

९) तपासणीअंती ज्या उमेदवारांची कागदपत्रे सेवा प्रवेश नियमानुसार योग्य असतील अशा उमेदवारांना नियुक्तीसाठी पात्र ठरविण्यात येईल.

१०) नियुक्तीसाठी पात्र ठरलेले उमेदवारांची त्यांच्या पसंतीक्रमाप्रमाणे व गुणानुसार जिल्हा निहाय नियुक्तीची प्रथम यादी घोषित करण्यात येईल.

११) वरीलप्रमाणे उमेदवारांना पुढील १५ दिवसांमध्ये संबंधित जिल्हयातील मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांकडे त्या जिल्हयामध्ये हजर होऊन मूळ कागदपत्र दाखल करावी लागतील.

१२) प्रथम यादीप्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या जिल्हयात वरीलप्रमाणे हजर होतांना उमेदवारांना freeze किंवा float यापैकी एक option निवडावा लागेल. Freeze Option निवडल्यावर ज्या उमेदवारांना नियुक्ती देण्यात आलेला जिल्हा अंतिमत: मान्य असुन यामध्ये बदल नको असल्याचे ग्राहय धरुन या जिल्हयात final नियुक्ती पत्र देण्यात येईल. जर उमेदवारानी float option दिला तर त्यांना द्वितीय यादीमध्ये प्राधान्यक्रमात वर असलेला जिल्हा मिळाल्यास प्रथम यादीत नियुक्ती मिळालेला जिल्हा सोडून त्या जिल्हयात जाणे मान्य असल्याचे ग्राहय धरण्यात येईल.

१३) वरीलप्रमाणे जे उमेदवार प्रथम यादीत नियुक्ती दिलेल्या ठिकाणी हजर होऊन मूळ कागदपत्र दाखल करत नाहीत, त्यांच्या ऐवजी cut-off marks ( न्युनतम पात्रता गुण ) प्राप्त केलेले व नियुक्तीसाठी पात्र ठरविलेले पण प्रथम यादीत स्थान प्राप्त न करु शकलेल्या उमेदवारांना त्यांचे गुणांनुसार व प्राधान्यानुसार ज्यांनी float option दिलेली आहे त्यांचेबरोबर जिल्हा नियुक्तीची द्वितीय व अंतिम यादी प्रसिध्द करण्यात येईल.

१४) वरील द्वितीय यादीप्रमाणे यशस्वी उमेदवारांना त्यांच्या नियुक्त केलेल्या ठिकाणी हजर होऊन final नियुक्ती घेणे बंधनकारक असून ही फेरी अंतिम राहील.

१५) निवड झालेल्या उमेदवारांना गुणवत्तेनुसार तसेच त्यांनी दिलेल्या प्राधान्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे नियुक्ती प्राधिकारी म्हणून नियुक्ती देतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra. gov. in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक- २०१७०८११४३६२६६६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bharat A Patil

Digitally signed by Bharat A Patil
DN: CN = Bharat A Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Date: 2017.08.24 17:34:03 +05'30'

( भरत पाटील )
अवर सचिव
ग्रामविकास व जलसंधारण विभाग

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव.
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन.
विभागीय आयुक्त (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व).
उपआयुक्त (आस्थापना) (सर्व).
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ).
सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन१३-अ) , मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (आस्था-८).